


# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष १, अंक १३(२) ] गुरुवार, जून २५, २००९/आषाढ ४, शके १९३१ [पृष्ठे ८, किंमत : रुपये १८.००

**असाधारण क्र. २९**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

**अनुक्रमणिका**



दिनांक २३ जून २००९ रोजी मा. राज्यपालांनी संमती दिलेला महाराष्ट्र विधानमंडळाचा पुढील अधिनियम माहितीसाठी, याद्वारे, प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**ह. बा. पटेल,**
सचिव, महाराष्ट्र शासन,
विधी व न्याय विभाग.

---

## सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५.

( मा. राज्यपालांची संमती मिळाल्यानंतर "**महाराष्ट्र शासन राजपत्रात**" दिनांक २५ जून २००९ रोजी प्रथम प्रसिद्ध केलेला अधिनियम. )

**पंढरपूर विकास क्षेत्रासाठी योजना तयार करणे ; उक्त योजनेअनुसार उक्त क्षेत्रात करावयाच्या विविध विकासविषयक कामांची वेळेत अंमलबजावणी करणे आणि त्या प्रयोजनासाठी संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांदरम्यान समन्वय राखणे ; उक्त योजनेमध्ये अंतर्भूत असलेल्या कामांचे नकाशे व अंदाज तयार करण्यासाठी निदेश देणे ; विकासविषयक कामांचे प्रस्ताव आणि नकाशे व अंदाज यांना प्रशासकीय मान्यता देणे, संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांनी कामांसाठी मागवलेल्या निविदांना मान्यता देणे, निविदांच्या मान्यतेनंतर संबंधित अभिकरणांना शासकीय अनुदाने देणे व संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांद्वारे**

**करण्यात येणाऱ्या विकासविषयक कामांच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करणे इत्यादी कामांकरिता पंढरपूर विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यासाठी आणि तत्संबंधित किंवा तदानुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम.**

**ज्याअर्थी,** सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर येथील विठ्ठल-रूक्मिणी मंदिर हे राज्यातील भाविकांचे एक महत्त्वाचे तीर्थक्षेत्र आहे आणि या मंदिरात तसेच आसपासच्या परिसरातील इतर मंदिरांत भाविक मोठ्या संख्येने देवदर्शनासाठी येतात ;

**आणि ज्याअर्थी,** अशा मोठ्या संख्येने येणाऱ्या भाविकांसाठी मूलभूत सोयीसुविधांची तरतूद करण्याची आवश्यकता आहे आणि अशा मोठ्या प्रमाणात येणाऱ्या लोकांच्या दृष्टीने पर्याप्त ठरेल अशा प्रकारे सुनियोजित पद्धतीने पंढरपूर शहराचा विकास करण्याची गरज आहे ;

**आणि ज्याअर्थी,** पंढरपूरचा सुनियोजित विकास करण्याची सुनिश्चिती करण्याच्या दृष्टीने विविध विभागांशी व अभिकरणांशी संबंधित अशा बहुसंख्य कामांची अंमलबजावणी करण्याची आवश्यकता आहे ;

**आणि ज्याअर्थी,** पंढरपूर नगरपरिषद क्षेत्राच्या व त्याच्या आसपासच्या परिसराच्या विकासाचे काम करणाऱ्या विविध अभिकरणांद्वारे अशा विविध विकासविषयक कामांची सुनियोजित रीतीने व उत्तम समन्वय साधून अंमलबजावणी करण्यासाठी विशेष विकास प्राधिकरण स्थापन करणे इष्ट आहे ;

**त्याअर्थी,** भारतीय गणराज्याच्या साठाव्या वर्षी, याद्वारे, पुढील अधिनियम करण्यात येत आहे :—

प्रकरण एक

**प्रारंभिक**

संक्षिप्त नाव व व्याप्ती.

**१.** (१) या अधिनियमास, पंढरपूर विकास प्राधिकरण अधिनियम, २००९ असे म्हणावे.

(२) तो, पंढरपूर नगरपरिषद क्षेत्र आणि पंढरपूर नगरपरिषदेच्या हद्दीपासून दहा किलोमीटरपर्यंतचे आसपासचे क्षेत्र यांस लागू असेल.

व्याख्या.

**२.** या अधिनियमात, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(१) " सोयीसुविधा " यामध्ये मार्ग, रस्ता, पूल, दळणवळणाची इतर कोणतीही साधने, खुली जागा, उद्यान, मनोरंजन मैदान, क्रीडांगण, बाग, बाजार आणि साफसफाई, वाहनतळाची जागा, पाणीपुरवठा व वीज यांचा पुरवठा, रस्त्यावरील दिवे, जलनिःस्सारण, मलनिःस्सारण, शैक्षणिक व आरोग्यविषयक सुविधा, कोणतीही कल्याणकारी उपाययोजना आणि कोणतीही उपयोगिता किंवा सेवा आणि राज्य शासनास विकास प्राधिकरणाशी विचारविनिमय करून, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, सोयीसुविधा म्हणून वेळोवेळी विनिर्दिष्ट करता येईल अशा कोणत्याही सोयीसुविधा या गोष्टी अंतर्भूत आहेत ;

(२) " अध्यक्ष " याचा अर्थ, पंढरपूर विकास प्राधिकरणाचा अध्यक्ष, असा आहे ;

१९७४ चा महा. ९.

(३) " देवस्थान समिती " याचा अर्थ, पंढरपूर मंदिर अधिनियम, १९७३ याच्या कलम २१ च्या पोट-कलम (१) अन्वये स्थापन केलेली " श्री विठ्ठल-रूक्मिणी मंदिर समिती " असा आहे ;

(४) " विकास " याचा त्याच्या व्याकरणिक फेरफारांसह अर्थ, कोणत्याही जमिनीतील किंवा जमिनीवरील किंवा जमिनीखालील (यात नदी, सरोवर यांखालील किंवा इतर कोणत्याही पाण्याखालील जमिनीचा समावेश होतो) बांधकामे, अभियांत्रिकी कामे, खाणकामे किंवा इतर कामे पार पाडणे

अथवा कोणत्याही बांधकामामध्ये किंवा जमिनीमध्ये कोणतेही महत्त्वपूर्ण बदल करणे, असा आहे आणि त्यात, कोणत्याही जमिनीच्या विकासाचा, पुनर्विकासाचा तसेच आराखड्याचा व उप-विभागाचा आणि तसेच सोयीसुविधांच्या तरतुदींचा समावेश होतो आणि " विकास करणे " या संज्ञेचा अन्वयार्थ तदनुसार लावण्यात येईल ;

(५) " विकास प्राधिकरण " याचा अर्थ, कलम ३ अन्वये स्थापन करण्यात आलेले पंढरपूर विकास प्राधिकरण, असा आहे ;

(६) " विकास योजना " याचा अर्थ, पंढरपूर नगरपरिषद आणि पंढरपूर नगरपरिषदेच्या नगर हद्दीपासून दहा किलोमीटरपर्यंतच्या आसपासच्या क्षेत्रासाठी, महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या तरतुदींअन्वये तयार केलेली योजना, असा आहे ; १९६६ चा महा. ३७.

(७) " शासकीय अभिकरण " याचा अर्थ, महाराष्ट्र शासनाचा कोणताही विभाग किंवा कार्यालय, असा आहे ;

(८) " पंढरपूर विकास क्षेत्र " याचा अर्थ, पंढरपूर नगरपरिषद क्षेत्र, असा आहे आणि त्यात त्या क्षेत्राच्या आसपासच्या दहा किलोमीटरपर्यंतच्या परिसराचा समावेश होतो ;

(९) " पंढरपूर विकास बृहत योजना " याचा अर्थ, या अधिनियमाच्या प्रयोजनासाठी राज्य शासनाने मंजूर केलेल्या पंढरपूर विकास क्षेत्राच्या विकासासाठीची योजना, असा आहे ;

(१०) " विहित " याचा अर्थ, या अधिनियमान्वये केलेल्या नियमांद्वारे विहित केलेले, असा आहे ;

(११) " विनियम " याचा अर्थ, या अधिनियमान्वये केलेले विनियम, असा आहे ;

(१२) " निम-शासकीय अभिकरण " याचा अर्थ, महाराष्ट्र शासनाने निर्माण केलेली कोणतीही वैधानिक किंवा अवैधानिक संघटना, निगम, प्राधिकरण, मंडळ किंवा शासकीय कंपनी, असा आहे.

प्रकरण दोन

**विकास प्राधिकरणाची स्थापना**

विकास प्राधिकरणाची स्थापना व विधिसंस्थापन.

**३.** (१) राज्य शासनास, या अधिनियमान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करण्यासाठी आणि तदन्वये सोपविण्यात आलेली कर्तव्ये व कामे पार पाडण्यासाठी, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, " पंढरपूर विकास प्राधिकरण " म्हणून ओळखल्या जाणाऱ्या एका विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) अन्वये स्थापन केलेले विकास प्राधिकरण हे अखंड परंपरा असणारा आणि एक सामाईक मुद्रा असणारा उक्त नावाचा निगम निकाय असेल, तसेच, जंगम व स्थावर अशा दोन्ही प्रकारच्या मालमत्तेबाबत करार करण्याचा, ती संपादन करण्याचा, ती धारण करण्याचा आणि तिची विल्हेवाट करण्याचा आणि या अधिनियमाच्या प्रयोजनांसाठी आवश्यक असतील अशा सर्व गोष्टी करण्याचा त्याला अधिकार असेल आणि निगम निकाय म्हणून असलेल्या त्याच्या नावाने त्याला किंवा त्याच्यावर दावा दाखल करता येईल.

(३) या विकास प्राधिकरणाचे मुख्यालय सोलापूर येथे असेल आणि सर्वसाधारणपणे त्याच्या बैठका सोलापूर येथे होतील. परंतु विकास प्राधिकरणाची निकड लक्षात घेऊन राज्यात इतरत्रदेखील कोणत्याही ठिकाणी त्याला बैठक घेता येईल.

विकास प्राधिकरणाची रचना.

४. (१) विकास प्राधिकरणामध्ये पुढील सदस्यांचा अंतर्भाव असेल :—

(क) सोलापूर जिल्ह्याचा पालक मंत्री .. .. अध्यक्ष ;

(ख) राज्य शासनाने नामनिर्देशित करावयाचा सोलापूर जिल्ह्यातील मंत्री किंवा राज्यमंत्री. उपाध्यक्ष ;

(ग) पंढरपूर विधानसभा मतदारसंघातून निवडून आलेला विधानसभा सदस्य. सदस्य ;

(घ) पंढरपूर नगरपरिषदेचा अध्यक्ष .. .. पदसिद्ध सदस्य ;

(ङ) राज्य शासनाने नामनिर्देशित करावयाच्या दोन नामांकित व्यक्ती सदस्य ;

(च) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर .. पदसिद्ध सदस्य ;

(छ) पोलीस अधीक्षक, सोलापूर जिल्हा .. .. पदसिद्ध सदस्य ;

(ज) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर .. पदसिद्ध सदस्य ;

(झ) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित, सोलापूर. .. पदसिद्ध सदस्य ;

(ञ) जिल्हा शल्यचिकित्सक, सोलापूर .. .. पदसिद्ध सदस्य ;

(ट) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सोलापूर .. पदसिद्ध सदस्य ;

(ठ) सहायक संचालक, नगररचना सोलापूर .. .. पदसिद्ध सदस्य ;

(ड) जिल्हा प्रकल्प अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर .. पदसिद्ध सदस्य ;

(ढ) अध्यक्ष, श्री विठ्ठल-रूक्मिणी मंदिर समिती, पंढरपूर पदसिद्ध सदस्य ;

(ण) मुख्याधिकारी, पंढरपूर नगरपरिषद .. .. पदसिद्ध सदस्य ;

(त) जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर .. .. पदसिद्ध सदस्य ;

(थ) जिल्हाधिकारी, सोलापूर जिल्हा .. .. पदसिद्ध सदस्य-सचिव.

(२) विकास प्राधिकरणाच्या अशासकीय सदस्यांचा पदावधी, त्यांच्या वित्तलब्धी आणि सेवेच्या इतर शर्ती विहित करण्यात येतील त्याप्रमाणे असतील.

(३) विकास प्राधिकरणाच्या कोणत्याही अशासकीय सदस्यास, कोणत्याही वेळी, राज्य शासनास, उद्देशून आपल्या पदाचा लेखी राजीनामा देता येईल, आणि राजीनामा स्वीकारल्यानंतर त्याचे पद रिक्त होईल.

(४) विकास प्राधिकरणाच्या कोणत्याही अशासकीय सदस्यास, जर तो,—

(क) अमुक्त नादार असेल ;

(ख) वेडा असल्याचे आढळून आले असेल किंवा तो विकल मनाचा असेल ; किंवा

(ग) ज्यात नैतिक अध:पाताचा अंतर्भाव असेल अशा कोणत्याही अपराधाबद्दल दोषी असेल किंवा तसे ठरवले असेल,

तर त्यास, पदावरून दूर करण्यात येईल.

विकास प्राधिकरण हे विशेष नियोजन प्राधिकरण असणे.

५. विकास प्राधिकरण हे, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या कलम ४० च्या पोट-कलम (१ख) च्या अर्थांतर्गत एक प्राधिकरण असेल आणि त्याअनुसार राज्य शासनाने पंढरपूर विकास क्षेत्राकरिता किंवा त्याच्या कोणत्याही भागाकरिता, विकास प्राधिकरण हे विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून घोषित करणे कायदेशीर असेल. १९६६ चा महा. ३७.

६. (१) विकास प्राधिकरण, आपल्या बैठकीचे कामकाज चालविण्याच्या बाबतीत (अशा बैठकीच्या गणपूर्तीसह) विहित करण्यात येतील अशा कार्यपद्धतीविषयक नियमांचे पालन करील. विकास प्राधिकरणाचे कामकाज.

(२) अध्यक्ष हा, विकास प्राधिकरणाच्या बैठकीचे अध्यक्षस्थान भूषवील आणि जर कोणत्याही कारणास्तव अध्यक्ष बैठकीस उपस्थित राहू शकणार नसेल तर, उपाध्यक्ष अशा बैठकीचे अध्यक्षस्थान भूषवील. जर उपाध्यक्ष देखील बैठकीस उपस्थित राहू शकणार नसेल तर उपस्थित असलेल्या सदस्यांनी आपल्यामधून निवडलेला इतर कोणताही सदस्य अशा बैठकीचे अध्यक्षस्थान भूषवील.

(३) पोट-कलम (१) मध्ये केलेल्या नियमांमध्ये अन्यथा तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, विकास प्राधिकरणाच्या कोणत्याही बैठकीमध्ये मांडलेल्या सर्व प्रश्नांवर उपस्थित असणाऱ्या व मतदान करणाऱ्या सदस्यांच्या बहुमताने निर्णय घेण्यात येईल आणि समसमान मते पडल्यास, अध्यक्षस्थान भूषवणारी व्यक्ती दुसरे किंवा निर्णायक मत देईल.

(४) अध्यक्षास, विकास प्राधिकरणाचे कामकाज चालन आणि प्रशासकीय बाबी यांचे सर्वसाधारण अधीक्षण व निदेशन करण्याचा अधिकार असेल आणि तो, विकास प्राधिकरण त्यास नेमून देईल त्याप्रमाणे, विकास प्राधिकरणाच्या इतर अधिकारांचा वापर करील व अशी अन्य कार्ये पार पाडील.

७. विकास प्राधिकरणाची कोणतीही कृती किंवा कार्यपद्धती ही, केवळ,— रिक्त पद, इत्यादी, कारणांमुळे विकास प्राधिकरणाची कार्यपद्धती विधिअग्राह्य न ठरणे.

(क) विकास प्राधिकरणामध्ये कोणतेही पद रिक्त आहे किंवा प्राधिकरणाच्या रचनेत कोणताही दोष आहे यामुळे ; किंवा

(ख) विकास प्राधिकरणाचा अध्यक्ष किंवा सदस्य म्हणून काम करणाऱ्या व्यक्तीच्या नेमणुकीमध्ये कोणताही दोष आहे यामुळे ; किंवा

(ग) विकास प्राधिकरणाच्या कामकाजात कोणतीही अनियमितता आहे, तथापि, ती जर प्रकरणाच्या योग्यायोग्यतेस बाधा पोहोचवत नसेल तर अशा अनियमिततेमुळे,

अवैध असणार नाही :

परंतु , कामकाजातील कोणतीही अनियमितता प्रकरणाच्या योग्यायोग्यतेस बाधा पोहोचवते आहे किंवा नाही असा जर कोणताही प्रश्न उद्‌भवला तर, ते प्रकरण राज्य शासनाकडे विचारार्थ पाठविण्यात येईल आणि त्यावरील त्याचा निर्णय अंतिम असेल.

## प्रकरण तीन

## विकास प्राधिकरणाचे अधिकार, कर्तव्ये आणि कार्ये

८. (१) या अधिनियमाच्या तरतुदींना आणि त्या त्यावेळी अंमलात असलेल्या अन्य कोणत्याही कायद्याला अधीन राहून, विकास प्राधिकरणाचे अधिकार, कर्तव्ये आणि कार्ये पुढीलप्रमाणे असतील :— विकास प्राधिकरणाचे अधिकार, कर्तव्ये आणि कार्ये.

(क) पंढरपूर विकास क्षेत्राच्या विकासाकरिता एक बृहत योजना तयार करणे आणि त्यासाठी राज्य शासनाची मान्यता घेणे ;

(ख) पंढरपूर विकास क्षेत्राच्या किंवा त्याच्या कोणत्याही भागाच्या संबंधात त्यास विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्त करण्यात आले आहे त्या भागाच्या विकासाकरिता विकास योजना तयार करणे किंवा जमिनीच्या विकासाचा प्रस्ताव तयार करणे आणि त्यासाठी राज्य शासनाची मान्यता घेणे ; महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या कलम ११५ अन्वये कोणत्याही जमिनीच्या विकासाकरिता कोणत्याही प्रस्तावास राज्य शासनाने मान्यता दिली असेल तर ती अशा अधिसूचित क्षेत्रात अंतिम असेल आणि अशा कोणत्याही योजनेच्या किंवा तिच्या भागाच्या तरतुदीमध्ये त्या मर्यादेपर्यंत, राज्य शासनाच्या उक्त मान्यतेच्या आधारे फेरबदल करण्यात येईल; १९६६ चा महा. ३७.

(ग) पंढरपूर विकास बृहत योजनेमध्ये मान्यता मिळालेल्या विकास कामाची सुव्यवस्थित अंमलबजावणी करणे, त्याचे विनियमन करणे, त्यांना चालना देणे व त्याची सुनिश्चिती करणे ;

(घ) पंढरपूर विकास बृहत योजनेमध्ये उद्दिष्ट ठेवलेल्या विविध विकासविषयक कामाच्या तपशीलवार योजना, आराखडे, नकाशे व अंदाज तयार करण्याकरिता आणि त्यांची अंमलबजावणी करण्याकरिता संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांची नियुक्ती करणे, त्यांच्या जबाबदाऱ्या विनिर्दिष्ट व निश्चित करणे ;

(ङ) शासकीय व निम-शासकीय अभिकरणांनी त्यास सादर केलेल्या विकासविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देणे ;

(च) मान्यता मिळालेल्या विकास कामांसाठी संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांमार्फत निविदा मागविणे आणि त्यांना मान्यता देणे ;

(छ) राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या अनुदानांचे, निविदा मान्य झाल्यानंतर, संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांना वाटप करणे ;

(ज) विकसित झालेली कामे, बांधकामे, उपयुक्त सेवा, इत्यादी पूर्ण झाल्यानंतर, पंढरपूर नगरपरिषद, पोलीस विभाग, देवस्थान समिती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, इत्यादी सारख्या संबंधित अभिकरणांकडे हस्तांतरित करणे ;

(झ) देवस्थान समिती आणि इतर अभिकरणे मंदिरातील महत्त्वाच्या वार्षिक यात्रेच्या प्रसंगी करावयाच्या व्यवस्था योग्यरीत्या करत असल्याबाबत खातरजमा करणे आणि त्यांचे संनियंत्रण करणे ;

(ञ) पंढरपूर विकास बृहत योजनेखालील कामाची आखणी करणे, त्यास मंजुरी देणे, त्याची अंमलबजावणी करणे किंवा त्यांचे संनियंत्रण करणे यांकरिता, विकास प्राधिकरणाचे कार्यालयीन काम किंवा अन्य कोणतेही काम पार पाडण्यासाठी, अंशकालिक किंवा पूर्णकालिक तत्त्वावर कोणत्याही शासकीय वा निम-शासकीय अभिकरणांच्या कोणत्याही अधिकाऱ्याच्या वा कर्मचाऱ्याच्या सेवा उपलब्ध करून देण्याची मागणी करणे :

परंतु, एकूण एका महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरिता पूर्णकालिक तत्त्वावर कोणत्याही अधिकाऱ्याची किंवा कर्मचाऱ्याची सेवा आवश्यक असेल अशा बाबतीत, विकास प्राधिकरण, राज्य शासनाची पूर्वपरवानगी घेईल ;

(ट) कोणत्याही शासकीय किंवा निम-शासकीय अभिकरणाकडे पंढरपूर विकास बृहत योजनेची किंवा तिच्या भागाची अंमलबजावणी करण्याची कोणतीही जबाबदारी सोपवणे :

परंतु, अशा प्रकारे जबाबदारी सोपवलेल्या संबंधित शासकीय किंवा निम-शासकीय अभिकरणाने ती जबाबदारी त्यांच्या कार्यालयीन कर्तव्याचा भाग समजून पार पाडणे हे त्याचे कर्तव्य असेल :

परंतु आणखी असे की, अशी कोणतीही जबाबदारी पार पाडण्यासाठी संबंधित शासकीय किंवा निम-शासकीय अभिकरणाकडून कोणतेही शुल्क आकारले जाणार नाही ;

(ठ) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ याच्या कलम ४० च्या पोट-कलम (१ख) अन्वये विनिर्दिष्ट केलेले विशेष नियोजन प्राधिकरणाचे सर्व अधिकार, कार्ये व कर्तव्ये पार पाडणे ; १९६६ चा महा. ३७.

(ड) राज्य शासनाने, त्यास, वेळोवेळी, नेमून दिलेले इतर सर्व अधिकार, कार्ये व कर्तव्ये पार पाडणे.

प्रकरण चार

## निधी, अर्थसंकल्प, लेखे आणि लेखापरीक्षा

**९.** राज्य शासन, यासंबंधात, कायद्याद्वारे, राज्य विधानमंडळाकडून यथोचित विनियोजन करण्यात आल्यानंतर, या अधिनियमाच्या प्रयोजनार्थ, प्रत्येक वित्तीय वर्षात, विनियोग करण्यासाठी म्हणून, त्यास योग्य वाटेल अशी एकत्रित रक्कम, राज्याच्या निधीमधून अनुदानांच्या स्वरूपात, विकास प्राधिकरणास देईल. राज्य शासनाकडून अनुदाने.

**१०.** (१) विकास प्राधिकरण, आपला आगामी वर्षाचा अर्थसंकल्प तयार करील व तो, विहित करण्यात येईल अशा नमुन्यात आणि अशा दिनांकापर्यंत, राज्य शासनाला सादर करील. अर्थसंकल्प, लेखे व लेखापरीक्षा.

(२) विकास प्राधिकरण, सोलापूर येथील शासकीय कोषागारामध्ये स्वीय खातेवही खाते उघडेल व ते खाते विकास प्राधिकरणाच्या सदस्य-सचिव याच्या नावाने चालविण्यात येईल.

(३) या अधिनियमाखालील विकास कामांकरिता खर्च करणे व अनुदानांचा वापर करणे याबाबतची कार्यपद्धती, राज्य शासनाच्या संबंधित वित्तीय नियमावलीप्रमाणे असेल, आणि अशा कामांचा योग्य अभिलेख ठेवणे, या प्रयोजनासाठी राज्य शासन विनिर्दिष्ट करील अशा ठराविक कालांतरांनी विकास प्राधिकरणाला उपयोजन प्रमाणपत्र सादर करणे, जेव्हा जेव्हा आवश्यक असेल तेव्हा तेव्हा लेखापरीक्षणांकरिता अभिलेख उपलब्ध करून देणे, ही संबंधित शासकीय व निम-शासकीय अभिकरणांची जबाबदारी असेल.

(४) या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये करण्यात आलेल्या खर्चाच्या संबंधातील विकास प्राधिकरणाच्या आणि शासकीय व निम-शासकीय अभिकरणांच्या लेख्यांचे, राज्य शासन **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करील त्याप्रमाणे स्थानिक निधी लेखापरीक्षा किंवा महालेखापाल यांच्या लेखापरीक्षकांकडून लेखापरीक्षण करण्यात येईल.

**११.** विकास प्राधिकरण, वर्षातून एकदा, विहित करण्यात येईल अशा नमुन्यामध्ये व वेळेत, त्यांच्या मागील वित्तीय वर्षातील कामाची संक्षिप्त माहिती देणारा वार्षिक अहवाल तयार करील आणि त्याची एक प्रत राज्य शासनाला पाठवील. विकास प्राधिकरणाचा वार्षिक अहवाल.

**१२.** विकास प्राधिकरण, राज्य शासन, आदेशाद्वारे, त्याच्या कार्यासंबंधी जी माहिती मागवील ती माहिती राज्य शासनाला देईल. शासनाचा माहिती मागविण्याचा अधिकार.

प्रकरण पाच

## संकीर्ण

**१३.** (१) राज्य शासनास, या अधिनियमाची प्रयोजने पार पाडण्यासाठी, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे नियम करता येतील. नियम करण्याचा अधिकार.

(२) नियम प्रथमच केले असतील तेवढे खेरीज करून एरव्ही, या अधिनियमाखाली केलेले सर्व नियम पूर्व प्रसिद्धीच्या शर्तींच्या अधीन असतील.

(३) या अधिनियमान्वये करण्यात आलेला प्रत्येक नियम, तो तयार करण्यात आल्यानंतर शक्य तितक्या लवकर राज्य विधानमंडळाचे अधिवेशन चालू असताना, एकाच अधिवेशनात किंवा लागोपाठच्या दोन किंवा अधिक अधिवेशनात मिळून एकूण तीस दिवसांची होईल इतक्या मुदतीकरिता राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल आणि ज्या अधिवेशनात तो अशारीतीने ठेवण्यात आला असेल ते अधिवेशन किंवा त्याच्या लगतनंतरचे अधिवेशन समाप्त होण्यापूर्वी त्या नियमात कोणताही फेरबदल करण्याबाबत दोन्ही सभागृहांचे एकमत झाले किंवा नियम करू नये म्हणून दोन्ही सभागृहांचे एकमत झाले आणि त्यांनी तशा आशयाचा निर्णय **राजपत्रात** अधिसूचित केला तर, असा निर्णय **राजपत्रात** प्रसिद्ध केल्याच्या दिनांकापासून अशा फेरबदल केलेल्या स्वरूपात तो नियम अंमलात येईल किंवा, यथास्थिति, अंमलात येणार नाही ; तथापि, असे कोणतेही फेरबदल किंवा विलोपन यामुळे त्या नियमान्वये पूर्वी केलेल्या किंवा करण्याचे वर्जिलेल्या कोणत्याही गोष्टीच्या वैधतेस बाध येणार नाही.

विनियम करण्याचा अधिकार.

**१४.** विकास प्राधिकरणास, राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेच्या अधीन राहून, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, विकास प्राधिकरणाच्या मते, या अधिनियमाखालील त्याच्या अधिकारांचा वापर करण्यासाठी आणि त्याची कार्ये पार पाडण्यासाठी ज्यांसाठी तरतूद करणे आवश्यक आहे, अशा सर्व किंवा कोणत्याही बाबींसाठी, या अधिनियमाशी आणि त्याखाली करण्यात आलेल्या नियमांशी सुसंगत असे विनियम करता येतील.

शासनाचा निदेश देण्याचा अधिकार.

**१५.** (१) राज्य शासन, लोकहित अंतर्भूत असलेल्या धोरणात्मक बाबींसंबंधात त्याच्या मते आवश्यक व इष्ट वाटतील असे निदेश विकास प्राधिकरणाला देईल आणि अशा निदेशांचे अनुपालन करणे हे त्याचे कर्तव्य असेल.

(२) पोट-कलम (१) मध्ये निर्दिष्ट केलेला कोणताही निदेश हा, लोकहित अंतर्भूत असलेल्या धोरणात्मक बाबीशी संबंधित आहे किंवा कसे असा कोणताही प्रश्न उद्‌भवल्यास, राज्य शासनाचा त्यावरील निर्णय हा अंतिम असेल.

विकास प्राधिकरणाचे विसर्जन.

**१६.** (१) ज्या प्रयोजनांसाठी या अधिनियमान्वये विकास प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली होती ती प्रयोजने मोठ्या प्रमाणात साध्य झालेली आहेत याबाबत राज्य शासनाची खात्री पटली असेल व त्यामुळे राज्य शासनाच्या मते, यापुढे विकास प्राधिकरण अस्तित्वात ठेवणे अनावश्यक असेल तर, राज्य शासनास, **राजपत्रातील** आदेशाद्वारे, आदेशात विनिर्दिष्ट करण्यात येईल अशा दिनांकापासून, विकास प्राधिकरण विसर्जित करण्यात येईल, असे घोषित करता येईल, आणि त्यानुसार विकास प्राधिकरण विसर्जित करण्यात येईल.

(२) पोट-कलम (१) खालील आदेशात विनिर्दिष्ट केलेल्या दिनांकापासून,—

(क) विकास प्राधिकरणाकडे निहित असतील, किंवा विकास प्राधिकरणाकडून संपादित करण्यायोग्य असतील अशा सर्व मालमत्ता, निधी आणि देणी, शासनाकडे निहित होतील, किंवा त्या सर्व, शासनाकडून संपादित करण्यायोग्य असतील ;

(ख) विकास प्राधिकरणाविरुद्ध अंमलबजावणीयोग्य असलेली सर्व दायित्वे, शासनाविरुद्ध अंमलबजावणीयोग्य असतील.

(३) पोट-कलम (१) अन्वये काढण्यात आलेला प्रत्येक आदेश, शक्य तितक्या लवकर, राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवण्यात येईल.

अडचणी दूर करण्याचा अधिकार.

**१७.** (१) या अधिनियमाच्या तरतुदी अंमलात आणताना, कोणतीही अडचण उद्‌भवल्यास राज्य शासनाला, प्रसंगानुरूप, **राजपत्रात** आदेश प्रसिद्ध करून अशी अडचण दूर करण्यासाठी त्यास आवश्यक किंवा इष्ट वाटेल व या अधिनियमाच्या तरतुदींशी विसंगत नसेल अशी कोणतीही गोष्ट करता येईल :

परंतु, या अधिनियमाच्या प्रारंभाच्या दिनांकापासून दोन वर्षांचा कालावधी संपल्यानंतर असा कोणताही आदेश काढता येणार नाही.

(२) पोट-कलम (१) अन्वये काढण्यात आलेला प्रत्येक आदेश, तो काढण्यात आल्यानंतर, शक्य तितक्या लवकर राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहासमोर ठेवण्यात येईल.

---

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHEDBY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004.




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग आठ

वर्ष १, अंक २४(२) ] गुरुवार, जून २५, २००९/आषाढ ४, शके १९३१ [ पृष्ठे १०, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ४७


**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Pandharpur Development Authority Act, 2009 (Mah. Act No. XV of 2009), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

---

**MAHARASHTRA ACT No. XV OF 2009.**

*(First published, after having received the assent of the Governor, in the "Maharashtra Government Gazette", on the 25th June 2009).*

An Act to provide for establishment of the Pandharpur Development Authority; for preparing plan for the Pandharpur Development Area; for ensuring timely implementation of various development works in the said area as per the said plan and for that purpose to ensure co-ordination between the concerned Government and Semi-Government agencies; giving directions for preparing plans and estimates of the works contained in the said plan, to grant

administrative approval to the proposals of development works and plans and estimates, to give approval to tenders for works invited by the concerned Government and Semi-Government agencies; to receive and release Government grants to the concerned agencies after approval of tenders and to monitor implementation of development works by the concerned Government and Semi-Government agencies; and for the matters connected therewith or incidental thereto.

WHEREAS Shri Vitthal-Rukmini Temple at Pandharpur in the Solapur District is an important place of pilgrimage in the State and a large number of pilgrims visit this temple and the other temples around it ;

AND WHEREAS such large number of pilgrims are required to be provided with basic amenities and there is need to develop the town of Pandharpur in a planned manner to cope up with such large floating population ;

AND WHEREAS in order to ensure planned development of Pandharpur, a number of works pertaining to different departments and agencies are required to be implemented ;

AND WHEREAS it is considered expedient to establish a Special Development Authority in order to ensure planned and well co-ordinated implementation of a variety of such development works through different agencies involved in development of the Pandharpur Municipal Area and its peripheral area; it is hereby enacted in the Sixtieth Year of the Republic of India as follows :—

## CHAPTER I

### PRELIMINARY

Short title and extent.

1. *(1)* This Act may be called the Pandharpur Development Authority Act, 2009.

*(2)* It extends to the area of the Pandharpur Municipal Council and its peripheral area upto ten kilometers from the limits of the Pandharpur Municipal Council.

Definitions.

2. In this Act, unless the context otherwise requires,—

*(1)* "amenity" includes road, street, bridge, any other means of communication, open space, park, recreation ground, play-ground, garden, market and conservancy, parking lot, supply of water and electricity, street lighting, drainage, sewerage, educational and health care facility, any welfare measure and any utility, or service and any convenience which the State Government may, in

consultation with the Development Authority, from time to time, by notification in the *Official Gazette*, specify to be an amenity ;

(2) "Chairperson" means the Chairperson of the Pandharpur Development Authority ;

Mah. IX of 1974. *(3)* " Deosthan Committee " means the "Shri Vitthal-Rukmini Temples Committee", established under sub-section *(1)* of section 21 of the Pandharpur Temples Act, 1973.

*(4)* "Development", with its grammatical variations, means the carrying out of building, engineering, mining or other operations in or over or under any land (including land under river, lake or any other water) or the making of any material change in any building or land and includes the development, re-development and layout and sub-division of any land and also the provision of amenities and "to develop" shall be construed accordingly ;

*(5)* "Development Authority" means the Pandharpur Development Authority established under section 3 ;

Mah. XXXVII of 1966. *(6)* "Development Plan" means the plan prepared under the provisions of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966, for the Pandharpur Municipal Council and its peripheral area upto ten kilometers from the limits of the Pandharpur Municipal Council ;

*(7)* "Government agency" means any Department or office of the Government of Maharashtra ;

*(8)* "Pandharpur Development Area" means the area of the Pandharpur Municipal Council and includes an area within its periphery of ten kilometers ;

*(9)* "Pandharpur Development Master Plan" means the plan for development of Pandharpur Development Area sanctioned by the Government of Maharashtra for the purposes of this Act ;

*(10)* "prescribed" means prescribed by rules made under this Act ;

*(11)* "regulations" means regulations made under this Act ;

*(12)* "Semi-Government Agency" means any statutory or non-statutory organisation, body, authority, Board or Government Company set-up by the Government of Maharashtra.

consultation with the Development Authority, from time to time, by notification in the *Official Gazette*, specify to be an amenity ;

(2) "Chairperson" means the Chairperson of the Pandharpur Development Authority ;

Mah. IX of 1974.

(3) " Deosthan Committee " means the "Shri Vitthal-Rukmini Temples Committee", established under sub-section *(1)* of section 21 of the Pandharpur Temples Act, 1973.

*(4)* "Development", with its grammatical variations, means the carrying out of building, engineering, mining or other operations in or over or under any land (including land under river, lake or any other water) or the making of any material change in any building or land and includes the development, re-development and layout and sub-division of any land and also the provision of amenities and "to develop" shall be construed accordingly ;

*(5)* "Development Authority" means the Pandharpur Development Authority established under section 3 ;

Mah. XXXVII of 1966.

*(6)* "Development Plan" means the plan prepared under the provisions of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966, for the Pandharpur Municipal Council and its peripheral area upto ten kilometers from the limits of the Pandharpur Municipal Council ;

*(7)* "Government agency" means any Department or office of the Government of Maharashtra ;

*(8)* "Pandharpur Development Area" means the area of the Pandharpur Municipal Council and includes an area within its periphery of ten kilometers ;

*(9)* "Pandharpur Development Master Plan" means the plan for development of Pandharpur Development Area sanctioned by the Government of Maharashtra for the purposes of this Act ;

*(10)* "prescribed" means prescribed by rules made under this Act ;

*(11)* "regulations" means regulations made under this Act ;

*(12)* "Semi-Government Agency" means any statutory or non-statutory organisation, body, authority, Board or Government Company set-up by the Government of Maharashtra.

